**भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांचे**
**<u>एक आठवडयाचे सेवातंर्गत प्रशिक्षण कार्यक्रम..</u>**
**प्रशिक्षणासाठी जाताना करावयाची प्रशासकीय**
**व्यवस्था....**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः भाप्रसे १०१४/प्र.क्र.१८०/२०१४/९**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२**
**तारीख: : ०१ ऑगस्ट, २०१४**

<u>वाचा -</u>

1) **शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: टीआरएन-१००३/प्र.क्र.१५/२००३/ दहा , दिनांक २९.५.२००३**

## <u>शासन परिपत्रक</u>-

भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांनी दरवर्षी एक आठवडयाचे सेवांतर्गत प्रशिक्षण कार्यक्रम पूर्ण करणे सक्तीचे आहे. सन २०१४-१५ या गट वर्षासाठी १ आठवडयाचे सेवातंर्गत प्रशिक्षण कार्यक्रमाचे वेळापत्रक केंद्र शासनाच्या कार्मिक व प्रशिक्षण विभागाने राज्य शासनास पाठविले असून कोणते प्रशिक्षण कोणत्या संस्थेमध्ये व कालावधीमध्ये आयोजित करण्यात आले आहे याचा तपशील त्यांनी पाठविला आहे. या प्रशिक्षण कार्यक्रमासाठी सन १९८४ ते २००९ या तुकडीतील भा. प्र.से अधिकारी नामनिर्देशने पाठविण्यास पात्र असल्याचे केंद्र शासनाने कळविले असल्यामुळे या तुकडीतील राज्यातील सर्व भाप्रसे अधिकाऱ्यांकडून इच्छूकता मागविण्यात आली होती. त्यानुसार भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांकडून शासनास प्राप्त झालेली नामनिर्देशने केंद्र शासनास पाठविण्यात आली आहेत.

२. सदर प्रशिक्षण कार्यक्रमातंर्गत भाप्रसे अधिकाऱ्यांची नामनिर्देशने कार्मिक व प्रशिक्षण विभागाकडून अंतिम करण्यात येतात व त्यानंतर त्यांचेकडून परस्पर संबंधित भाप्रसे अधिकाऱ्यांना व संबंधित प्रशिक्षण संस्थेस कळविली जातात.

३. केंद्र शासनाच्या कार्मिक व प्रशिक्षण विभागाकडून नामनिर्देशने अंतिम केल्याबाबतचे पत्र संबंधित भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांना प्राप्त झाल्यानंतर संबधित अधिकारी हे पुन्हा सामान्य प्रशासन विभागाकडून प्राप्त होणाऱ्या पत्राची प्रतिक्षा करतात. यामध्ये होणारा कालापव्यय कमी करण्यासाठी भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांनी प्रस्तुत सेवातंर्गत प्रशिक्षण कार्यक्रमासाठी उपस्थित राहताना प्रशासकीय व्यवस्था करण्याबाबत पुढील कार्यपध्दतीचा अवलंब करावा :-

1) एक आठवडयाच्या सेवातंर्गत प्रशिक्षण कार्यक्रमासाठी भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांचे नामनिर्देशन केंद्र शासनाच्या कार्मिक व प्रशिक्षण विभागाकडून अंतिम केल्यानंतर त्याची सूचना कार्मिक व प्रशिक्षण विभागाकडून परस्पर संबंधित भाप्रसे अधिकाऱ्यांना व संबंधित प्रशिक्षण संस्थेस ईमेल/पत्राव्दारे कळविली जाते.

२) एक आठवडयाच्या सेवातंर्गत प्रशिक्षण कार्यक्रमासाठी नामनिर्देशन अंतिम केल्याचे पत्र केंद्र शासनाच्या कार्मिक व प्रशिक्षण विभागाकडून संबंधित भाप्रसे अधिकाऱ्यांना प्राप्त झाल्यानंतर संबंधित अधिकाऱ्यांनी सामान्य प्रशासन विभागाकडून त्यांना कळविले जाण्याची प्रतिक्षा न करता, वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या सल्ल्याने त्यांच्या प्रशिक्षणाच्या अनुपस्थितीच्या कालावधीतील प्रशासकीय व्यवस्था स्थानिक पातळीवरच करून त्यांनी प्रशिक्षणासाठी कार्यमुक्त व्हावे व सेवातंर्गत प्रशिक्षणासाठी उपस्थित रहावे. त्याकरिता सामान्य प्रशासन विभागाकडून वेगळया पत्राची प्रतिक्षा करू नये. मात्र सदर प्रशिक्षण पूर्ण केल्यानंतर याबाबतची माहिती प्रशिक्षण पूर्ण केल्याच्या प्रमाणपत्रासह सामान्य प्रशासन विभागास (कार्यासन-९ /९अ / १० ) कळविण्यात यावी.

३) मंत्रालयीन प्रशासकीय विभागामध्ये अ.मु.स. /प्रधान सचिव/सचिव या पदावर कार्यरत असलेल्या भाप्रसे अधिकाऱ्यांचे एक आठवडयाच्या सेवातंर्गत प्रशिक्षण कार्यक्रमासाठी केंद्र शासनाने नामनिर्देशन अंतिम केल्यानंतर त्याबाबतची माहिती सा.प्र.वि./कार्यासन-१० ला त्वरित द्यावी. अशा प्रशिक्षण कालावधीमध्ये सदर अधिकारी कार्यरत असलेल्या पदाचा अतिरिक्त कार्यभार अन्य अधिकाऱ्याकडे सोपविण्याची कार्यवाही सामान्य प्रशासन विभागाकडून (कार्यासन-१०) केली जाईल. त्यांनतरच अशा अधिकाऱ्यांनी कार्यमुक्त होवून प्रशिक्षणासाठी उपस्थित रहावे.तसेच प्रशिक्षण पूर्ण केल्यानंतर त्याबाबतची माहिती प्रशिक्षण पूर्ण केल्याच्या प्रमाणपत्रासह सामान्य प्रशासन विभागास (कार्यासन -९/९अ/१०) यांना पाठवावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१४०८०११०४४२७६३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UMARANIKA
R SUBHASH H

Digitally signed by UMARANIKAR SUBHASH H
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=UMARANIKAR SUBHASH H
Date: 2014.08.01 12:00:33 +05'30'

**(सु.ह.उमराणीकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
३. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग,

४. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव
५. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
६. महाराष्ट्र संवंर्गातील सर्व भा.प्र.से. अधिकारी
७. निवड नस्ती